**शासकीय / शासकीय स्वयंसहाय्यीत / अशासकीय अनुदानित, विद्यापीठातील अनुदानित / विना अनुदानित / स्वयंसहाय्यीत पदव्युत्तर शिक्षण विभाग तसेच अशासकीय विना अनुदानित / कायम विना अनुदानित नियमित एम. एड. अभ्यासक्रम**

**सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षासाठी शिक्षण शुल्क व प्रवेश पद्धती याबाबतची नियमावली.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : एम.एड. २०११ / प्र. क्र. १०८ / मशि - २,
**मंत्रालय ( विस्तार ), मुंबई - ४०० ०३२.**
दिनांक : ३० सप्टेंबर, २०११.

वाचा : १. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक एम.एड. २०११ / प्र. क्र. २१ / मशि - २, दिनांक ९ मार्च, २०११ व समक्रमांकाचे शासन शुद्धीपत्रक, दिनांक २३ मार्च, २०११

२. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक : एम.एड. २०११ / प्र. क्र. १०८ / मशि - २, दिनांक ५ मे, २०११.

३. शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं / एम.एड. सी.ई.टी./२०११-१२/बी.एड, दिनांक ०३.०९.२०११ चे पत्र.

## शासन निर्णय

शासन निर्णय, दिनांक ९ मार्च, २०११ व शासन शुद्धीपत्रक दिनांक २३ मार्च, २०११ अन्वये राज्यात शैक्षणिक वर्ष २०११-१२ पासून शासकीय / शासकीय स्वयंसहाय्यीत / अशासकीय अनुदानित, विद्यापीठातील अनुदानित / विना अनुदानित / स्वयंसहाय्यीत पदव्युत्तर शिक्षण विभाग तसेच अशासकीय विना अनुदानित / कायम विना अनुदानित नियमित एम. एड. अभ्यासक्रमासाठी केंद्रीभूत प्रवेश पद्धतीने प्रवेशासाठी सामायिक प्रवेश परीक्षा ( CET ) लागू करण्यात आली आहे. सदरहू शासन निर्णयास अनुसरुन एम. एड. प्रवेशाबाबतच्या नियमांस सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षासाठी दिनांक ५ मे, २०११ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक ०३.०९.२०११ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन एम. एड. प्रवेशाबाबतच्या सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षासाठी दिनांक ५ मे, २०११ अन्वये मंजूरी दिलेल्या नियमावलीतील नियम क्रमांक १.४ मधील उप नियम (२) मधील सी.ई. टी. उत्तीर्णतेच्या किमान गुणांची अट **सन २०११-२०१२ या वर्षापुरती सीईटी ला खुला संवर्ग यांना ५० पैकी किमान २५ ऐवजी किमान १८ गुण व मागासवर्गीय संवर्गाला (अ.जा, अ.ज. वि.जा.भ.ज, इ.मा. व. तसेच वि.मा.प्र.) किमान २० ऐवजी किमान १३ गुण** याप्रमाणे सुधारीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर २०११०९३०१४५३४४००१ येथे उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

**( वि. मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय,कार्यालय,
कुलसचिव, महाराष्ट्रातील, सर्व अकृषि विद्यापीठे,
सदस्य सचिव, प्रवेश नियंत्रण व शिक्षण शुल्क समिती, शासकीय तंत्रनिकेतन, खेरवाडी, वांद्रे ( पूर्व ), मुंबई ५१,
सचिव, विना अनुदानित अध्यापक महाविद्यालये संस्था चालक असोसिएशन, १५ शार्दुल अपार्टमेंट्स, जुना टोल नाका, मुंबई बायपास, उत्सव मंगल कार्यालयाजवळ, वडगांव (बुद्रुक), पुणे ४०० ०४१,
निवड नस्ती (मशि-२), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.